**श्री. मनोज के. कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई यांच्याकरीता सहायक कक्ष अधिकारी सवंर्गात एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सववि-१३१६/प्र.क्र. ३९/आस्था-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०९ जून, २०१७

<u>वाचा</u> :- १) श्री. मनोज कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी यांचे दिनांक ०७/०१/२०१६ रोजीचे पत्र
२) विकलांग व्यक्तीसाठी, अधिनियम (हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग, समान संधी) १९९५ चे कलम ४७
३) सर ज.जी. समूह रुग्णालयाचे पत्र आणि त्यासोबतचे दि.२२/१२/२०१६ रोजीचे प्रमाणपत्र
४) वित्त विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १९/५/२०१७ रोजीच्या बैठकीचे दि.६/६/२०१७ रोजीचे कार्यवृत्त.

**<u>प्रस्तावना</u> :-**

श्री. मनोज के. कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी हे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत अपंग कोटयातून लिपिक पदावर दिनांक २६/१२/१९८५ रोजी शासन सेवेत रुजू झाले आहेत. श्री. मनोज के. कंदाडे हे सद्य:स्थितीत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात सहायक कक्ष अधिकारी पदावर कार्यरत असून ते रु.९३००-३४८००+ ग्रे. वे. रु.४८०० या वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत. श्री. कंदाडे यांना सेरेब्रल पाल्सी हा आजार आहे. या आजारामुळे डिसेंबर, २०१५ मध्ये श्री. कंदाडे यांची प्रकृती खूपच खालावली व त्यांच्या शारिरीक अपंगत्वात वाढ झाली. त्यामुळे त्यांना कार्यालयात येणे अशक्य झाले. श्री. मनोज के. कंदाडे हे दि.१८/१२/२०१५ पासून त्यांच्या तब्येतीच्या कारणास्तव कार्यालयात उपस्थित राहू शकलेले नाहीत. सर ज.जी. समूह रुग्णालयाने श्री. मनोज कंदाडे , हे “ completely and permanently incapacitated for further service of any kind ” असे प्रमाणपत्र दि.२२/१२/२०१६ रोजी दिले आहे. त्यानुसार विकलांग व्यक्तीसाठी ( समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग ) अधिनियम, १९९५ च्या कलम ४७ मधील तरतूदीनुसार कर्मचा-यांला कोणत्याही पदावर सामावून घेणे शक्य नसेल तर योग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या सेवानिवृत्तीपर्यंत यापैकी अगोदर घडेल तोपर्यंत त्याला अधिसंख्य पदावर ठेवता येईल. सदर तरतूद विचारात घेऊन श्री. मनोज के. कंदाडे , सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांच्याकरीता सेवासंरक्षणासहीत सर्व लाभ देण्याकरीता सहायक कक्ष अधिकारी या संवर्गातील १ अधिसंख्य पद दि.१८/१२/२०१५ पासून श्री. कंदाडे यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

श्री. मनोज के. कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे रु.९३००-३४८०० + ग्रे. वे. रु.४८०० या वेतनश्रेणीतील वेतन काढण्यासाठी सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील १ अधिसंख्य पद दिनांक १८/१२/२०१५ पासून निर्माण करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर अधिसंख्य पद सहकार, पणन व वस्त्रोद्योग, मंत्रालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. सदर पद विकलांग व्यक्तीसाठी ( समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग ) अधिनियम, १९९५ च्या कलम ४७ मधील तरतूदीनुसार श्री. मनोज के. कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी यांना सेवा संरक्षणासहित सर्व लाभ देण्याकरिता, दि.१८/१२/२०१५ पासून श्री. कंदाडे यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण करण्यात येत आहे. त्यानंतर सदर पद आपोआप संपुष्टात येईल.

४. सदर पदाच्या वेतन व भत्यावरील खर्च हा " मागणी क्रमांक - व्ही-२, ३४५१- सचिवालयीन- आर्थिक सेवा, (००)(०९०) - सचिवालयीन, (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग दत्तमत ( २४५१ ०३०४ ) ०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा .

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२५/आ.पु.क., दि २०/४/२०१७ अनुसार व उच्च स्तरीय समितीच्या दिनांक १९ मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या सन २०१७ च्या दुसऱ्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०६१२१२२६४४२६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sudin Gaikwad

Digitally signed by Sudin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing Tax Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=20315cd32e197cc2334676dbe1f09f90b2334ed df7e75d09609003b414273f73, cn=Sudin Gaikwad
Date: 2017.06.17 16:18:30 +05'30'

**( डॉ सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव ,मंत्रालय, मुंबई
३) मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव ( सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
८) महालेखापाल ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती)
११) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती)
१२) उप कोषागार अधिकारी , नवी मुंबई, वाशी
१३) वित्त विभाग ( व्यय-२ / आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई
१४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ( अक-२), मंत्रालय, मुंबई

१५) सामान्य प्रशासन विभाग ( १४-अ ), मंत्रालय, मुंबई

१६) श्री. मनोज कंदाडे, सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

१७) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

१८) कक्ष अधिकारी ( रोखशाखा ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मत्रालय, मुंबई

१९) निवड नस्ती आस्था-१.